**गोंदिया वनविभागात मोहफुलांचे संकलन, संस्करण, साठवणुक मुल्यवर्धन व विपणन याबाबतच्या बांधकामाच्या दोन अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. वनबां-२०१७/प्र.क्र.४६०/फ-९**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- ०१ ऑक्टोबर, २०१८

**वाचा :-** अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष २४ (३)/प्र.मं./प्र.क्र.११९/७८४/२०१७-१८, दिनांक ०६.१२.२०१७.

**प्रस्तावना:-**

मुख्य वनसंरक्षक (प्रा.), नागपूर यांचे संयुक्त वनव्यवस्थापन (२४०६ १५२१) या योजने अंतर्गत गोंदिया वनविभागात मोहफुलांचे संकलन, संस्करण, साठवणुक मुल्यवर्धन व विपणन याबाबतच्या बांधकामाचे दोन अंदाजपत्रकास शाखा अभियंता, वन अभियंता कार्यालय, नागपूर यांनी तयार केले असून उप वनसंरक्षक, नागपूर विभाग, गोंदिया यांनी स्वाक्षांकित केले आहे. सदर अंदाजपत्रकास वन अभियंता, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी तांत्रिक मंजूरी प्रदान करुन सदर कामाचे अंदाजपत्रक संदर्भाधिन पत्रान्वये अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत विनंती केली आहे. त्यानुसार या कामासाठी दोन अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मुख्य वनसंरक्षक (प्रा.), नागपूर यांचे संयुक्त वनव्यवस्थापन (२४०६ १५२१) या योजने अंतर्गत गोंदिया वनविभागात मोहफुलांचे संकलन, संस्करण, साठवणुक मुल्यवर्धन व विपणन याबाबतच्या बांधकामाचे दोन अंदाजपत्रकास शाखा अभियंता, वन अभियंता कार्यालय, नागपूर यांनी तयार केलेल्या दोन अंदाजपत्रकाच्या अनुक्रमे रु.२७,२३,०००/- व रु.५१,४२,०००/- या किंमतीवर १२ टक्के वस्तु व सेवा कराची तरतूद परिगणीत करुन येणाऱ्या किंमतीस सार्वजनिक बांधकाम विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन व खालील अटींच्या अधीन राहून (वित्तीय मान्यता वगळून) शासनाची प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. उपरोक्त अंदाजपत्रके सन २०१५-१६ च्या दरसूचीवर आधारित असल्याने, त्या दरांमध्ये तत्कालीन प्रचलीत करांचा समावेश असण्याची शक्यता असून एकूण किंमतीमध्ये वस्तु व सेवा कराची तरतूद समाविष्ट केल्याने करांची द्विरुक्ती होण्याची शक्यता नाकारता येत नाही. तथापि सदर कामे प्रत्यक्ष सुरु करण्यापूर्वी सविस्तर अंदाजपत्रकांना तांत्रिक मान्यता देतांना करांची द्विरुक्ती होणार नाही. याची सक्षम अधिका-यांनी खातरजमा करावी.

२. सद्यस्थितीत प्रशासकीय मान्यता देतेवेळी प्रचलित दरसूचीनुसार कार्यवाही होणे अपेक्षित आहे. तथापि तांत्रिक मान्यतेवेळी प्रचलीत दरसूची व सार्वजनिक बांधकाम नियमावलीनुसार कार्यवाही करण्यात यावी.
३. सदर बांधकामाच्या अनुषंगाने सार्वजनिक बांधकाम विभागाचा शासन निर्णय क्र.बीडीजी-२०१४/प्र.क्र. ९६/इमा-३, दिनांक ८.७.२०१४ मधील कार्यपध्दतीनुसार कार्यवाही करण्यात यावी.
४. काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.
५. ढोबळ स्वरूपात धरण्यात आलेल्या तरतुदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक दरपत्रके मंजूर करूनच काम हाती घ्यावे.
६. प्रत्यक्ष काम करते वेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही/२०१३/ प्र.क्र.१७७/ तां.क.१, दि.१० जानेवारी २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.
७. सदरहू कामे करतांना वन (संवर्धन) अधिनियम १९८० अंतर्गत तरतूद तसेच प्रचलित कायदे / नियम संदर्भाधिन तरतूदींचा भंग होणार नाही. तसेच कोणतीही अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी.

हे आदेश शासन निर्णय वित्त विभाग, क्र. विअप्र १०.०८/प्र.क्र.७०/२००८/ विनियम, दिनांक १५ मे, २००९, वित्तीय अधिनियम नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पाच नुसार महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका अंतर्गत प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार, अ.क्र. १, परिच्छेद क्र. १३४ नुसार विभागास असलेल्या वित्तीय अधिकारानुसार व सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या सहमतीने, निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१००११८०५१५४४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sujay Dodal

Digitally signed by Sujay Dodal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=353112ee0fa47f9ff9bedae88f651d09fdb142df5fbce9c004f7eea06d8b9baf, cn=Sujay Dodal
Date: 2018.10.01 18:10:17 +05'30'

**( सुजय दोडल )**
**सह सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), नागपूर.

४. उप वनसंरक्षक, नागपूर विभाग, गोंदिया.
५. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
६. सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७. वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८. नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९. फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१०. कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती)